सन २०२०-२१ करीता महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकीय सेवा योजनांतर्गत (MEMS) कार्यान्वित रुग्णवाहीकांवरील आवर्ती खर्चासाठी निधी मंजूर करण्याबाबत. (मे, २०२० चे ७० टक्के देयक)

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः ईएमएस-२०२०/प्र.क्र.१३५/ आरोग्य -३

१० वा मजला , गोकुलदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१.
दिनांक: १६ जुलै, २०२०.

वाचा-

१) शासन निर्णय,सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः ईएमएस-२०११/प्र.क. २२४ / आरोग्य-३, दिनांक २८ मार्च, २०१३.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः पीएचडी-३००११/ प्र.क्र. ३८७/ २०१६/ आरोग्य ७, दिनांक १५ जून, २०१६
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः ईएमएस- २०१८/प्र.क्र.२७०/ आरोग्य -३, दिनांक ०८ मे, २०१९.
४) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः ईएमएस- २०१८/प्र.क्र.२७०/ आरोग्य -३, दिनांक २९जुलै, २०१९.
५) शासन पत्र, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः ईएमएस-२०१८/ प्र.क्र.२७०/ आरोग्य -३ , दिनांक ०४ जानेवारी, २०२०.
६) शासन पत्र, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः ईएमएस- २०१९/ प्र.क्र.१७७/ आरोग्य -३, दिनांक १७ मार्च, २०२०.
७) शासन पत्र, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः ईएमएस- २०१९/ प्र .क्र.१७७/ आरोग्य -३, दिनांक ७ जुलै, २०२०.
८) आरोग्य सेवा संचालनालयाचे पत्र क्रमांकः संआसे/कक्ष-३/टे-४/अनु.वितरण/MEMS-१०८/April-२०/३२७७-७९/२०२०,दि.००.००.२०२०.

प्रस्तावना:-

राज्यात आपदग्रस्तास तातडीने वैद्यकीय मदत मिळावी याकरीता अत्याधुनिक दळणवळण यंत्रणेसह वैद्यकीय उपकरणांनी सुसज्ज अशा रुग्णवाहिकांची सेवा उपलब्ध करुन देण्यासाठी राष्ट्रीय आरोग्य अभियानाच्या माध्यमातून खुली निविदा मागवून सेवा पुरवठादाराची निवड करण्यासाठी शासन निर्णय, दि.२८.१०.२०१० अन्वये अप्पर मुख्य सचिव (आरोग्य) यांच्या अध्यक्षतेखाली निविदा समिती स्थापन करण्यात आली होती. सदर निविदा समितीने

मे.बी.व्ही.जी.इंडीया यांनी सादर केलेली निविदा पात्र ठरवून संपुर्ण राज्यात २३३ ॲडव्हान्स लाईफ सपोर्टींग (ALS) आणि ७०४ बेसिक लाईफ सपोर्टींग (BLS) अशा एकूण ९३७ रुग्णवाहिकांची आपत्कालिन प्रतिसाद सेवा (EMS) पुढील ५ वर्षात राबविण्यासाठी मे.बी.व्ही.जी.इंडीया या सेवा पुरवठादारास शासन निर्णय दिनांक २८ मार्च, २०१३ अन्वये कार्यारंभ आदेश देण्यात आले. सदर योजना दिनांक २६ जानेवारी, २०१४ पासून कार्यान्वित करण्यात आली. या योजनेस सन २०१४-१५ व २०१५-१६ मध्ये काही प्रमाणात राष्ट्रीय आरोग्य अभियानामार्फत केंद्र शासनाकडून अनुदान प्राप्त होत होते आणि उर्वरित अनुदान राज्य योजनेतून वितरीत करण्यात येत होते. उपरोक्त अ. क्र.२ येथील शासन निर्णयान्वये सन २०१६-१७ पासून सदर योजना राष्ट्रीय आरोग्य अभियाना कडून संचालक, आरोग्य सेवा यांच्याकडे हस्तांतरीत करण्यात आली. यास्तव सन २०१६-१७ पासून सदर योजना राज्य योजना म्हणून कार्यान्वित आहे. सदर योजनेबाबत सेवापुरवठादाराशी केलेल्या करारपत्रानुसार सदर कराराची मुदत दिनांक ३१ जानेवारी, २०१९ रोजी संपुष्टात आली तथापि, रूग्णसेवेमध्ये अडचणी न येता रूग्णवाहिका सेवा विनाखंड सुरू राहण्यासाठी तातडीची बाब म्हणून दिनांक ३१ मार्च,२०१९ च्या शासन निर्णयान्वये फेब्रुवारी, २०१९ ची देयके जानेवारी,२०१९ च्या दराने अदा करण्यासाठी सेवा पुरवठादारास मुदतवाढ देण्यात आली होती. या नंतर शासन निर्णय दिनांक ३ जानेवारी,२०१९ अन्वये गठित करण्यात आलेल्या अ.मु.स. (वित्त) यांच्या अध्यक्षतेखालील समितीने घेतलेल्या निर्णयानुसार रूग्णवाहिका सेवा विनाखंड सुरू ठेवण्यासाठी जानेवारी २०१९च्या दरानुसार सेवा चालू ठेवण्यास सेवा पुरवठादारास १ मार्च, २०१९ ते ३० जून, २०१९ पर्यंत दिनांक ८ मे, २०१९ च्या शासन निर्णयान्वये, १ जुलै, २०१९ ते ३१ ऑक्टोबर, २०१९ पर्यंत दिनांक २९ जुलै, २०१९ च्या शासन निर्णयान्वये, दि.०१ नोव्हेंबर,२०१९ ते ३१ जानेवारी, २०२० पर्यंत दि.०४.०१.२०२० च्या शासन पत्रान्वये, दि.०१ फेब्रुवारी,२०२० ते ३० एप्रिल, २०२० पर्यंत दि.१७.०३.२०२० च्या शासन पत्रान्वये, दि.०१ मे,२०२० ते ३१ जुलै, २०२० पर्यंत दि.०९.०७.२०२० च्या शासन पत्रान्वये मुदतवाढ देण्यात आली, त्यानुसार सदर योजनेवरील माहे मे,२०२० च्या देयकामधील ७० टक्के रकमेच्या आवर्ती खर्चास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय :-

महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकीय सेवा योजना अंतर्गत कार्यान्वित असलेल्या टोल फ्री क्रमांक १०८ च्या सुसज्ज रुग्णवाहीकांवरील आवर्ती खर्चासाठीच्या सन २०२०-२१ मधील माहे मे, २०२० च्या एकूण रु.२३,१२,३३,१८६/- या देयकाच्या ७० टक्के रु.१६,१८,६३,२३०/- (रु.सोळा कोटी अठरा लाख त्रेसष्ठ हजार दोनशे तीस फक्त) देयक (जानेवारी,२०१९ च्या दराने) अदा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. उपरोक्त रुग्णवाहीकांमार्फत पुरविण्यात आलेल्या सेवांचा तपशील दरमहा शासनास सादर करण्यात यावा. दंडाची आकारणी झाली असल्यास, ३० टक्के च्या उर्वरित देयकामधून वसूल करण्यात यावी.सदर माहे मे,२०२० चे देयक जानेवारी, २०१९ च्या दरानुसार अदा करण्यात यावे.

३. सदर प्रस्तावावरील खर्च मागणी क्र. आर-१, २२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ८००, इतर खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना, ०१ किमान गरजा कार्यक्रम (०१) (१०)- ट्रॉमा केअर युनिटची स्थापना-महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकीय सेवा,(२२१०४६८९) - १३ कार्यालयीन खर्च या मुख्य लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि हा खर्च सन २०२० -२१ या वित्तीय वर्षासाठी केलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि.१७.४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ भाग-१, उपविभाग-४ मधील अ.क्र. ११ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार तसेच त्यात नमूद अटीची पुर्तता करुन सदरचा मंजूरी आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००६१२१४४४३६७११७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपालयांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2020.07.16 13:41:54 +05'30'

**(रो.दि.कदम-पाटील)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)(लेखा परिक्षा),महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
२. आयुक्त (आरोग्य सेवा) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४. सह संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, मुंबई.
५. सहाय्यक संचालक (लेखा व लेखा परिक्षा), आरोग्य सेवा, पुणे.
६. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

९. नियोजन विभाग (का. १४७२), मंत्रालय, मुंबई.
१०. वित्त विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
११. सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प शाखा/लेखा शाखा) मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (आरोग्य - ३).